महाराष्ट्र विकास सेवा गट-अ मधील अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी / प्रकल्प संचालक पदावरील तात्पुरती पदोन्नती.

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
### शासन आदेश क्रमांकः मविसे-१०१४/प्र.क्र.२७५/२०१४/आस्था-३,

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई - ४०० ००१.
तारीख: २७ ऑगस्ट, २०१५.

संदर्भ-

१) शासन अधिसूचना सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.१५६/का.१२, दिनांक २८.०४.२०१५.
२) शासन अधिसूचना सामान्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.१५६/का.१२, दिनांक १६.७.२०१५.

**शासन आदेश:-**

महाराष्ट्र विकास सेवा गट-अ मधील निवडश्रेणी उप मुख्य कार्यकारी अधिकारी आणि तत्सम पदे या संवर्गातील खालील अधिकाऱ्यांना या आदेशान्वये अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी / प्रकल्प संचालक पदावर (पीबी-३ वेतनश्रेणी रुपये १५६००-३९१०० ग्रेडवेतन ७६००) तात्पुरती पदोन्नती देण्यात येत आहे.

तद्नुषंगाने शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.१५६/ का.१२, दिनांक २८.०४.२०१५ आणि शासन अधिसूचना सामान्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही-२०१५ /प्र.क्र.१५६/का.१२, दिनांक १६.७.२०१५ नुसार पदोन्नतीने नियुक्तीसाठी विहीत केलेल्या महसुली विभाग वाटप नियम, २०१५ मधील तरतूदींनुसार सदर तदर्थ पदोन्नत अधिकाऱ्यांना खालील

तक्त्यातील त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र.३ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी पदोन्नतीने पदस्थापना देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव व प्रवर्ग सध्याचे पदनाम व ठिकाण | तदर्थ पदोन्नतीनंतरच्या पदस्थापनेचे पदनाम व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्री.विजयकुमार पांडुरंग कुंभार, सहायक आयुक्त (चौकशी), विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे विभाग, पुणे. | प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जि. सोलापूर. | रिक्त पदी |
| २. | डॉ.श्री.प्रमोद सोपान शिंदे, सल्लागार, संवाद व विकास क्षमता कक्ष, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, नवी मुंबई. | प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जि.अहमदनगर. | रिक्त पदी |
| ३. | श्री.राजाराम बाबासाहेब दिघे, संचालक, राजमाता जिजाऊ माता बाल-आरोग्य व पोषण मिशन, नवी मुंबई. | प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जि.नाशिक. | रिक्त पदी |
| ४. | श्रीमती लीना बनसोड, अतिरिक्त संचालक, विशेष कोअर कक्ष, राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियान, नवी मुंबई. | प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जि. नागपूर. | रिक्त पदी |
| ५. | श्री.सुनिल आनंदराव कौसाडीकर, सहायक आयुक्त (चौकशी), विभागीय आयुक्त यांचे कार्यालय, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद. | प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जि.जालना | श्री.बी.डी. पटेल यांच्या दि.३१.८.२०१५ रोजी से.नि. मुळे रिक्त होणाऱ्या पदी |
| ६. | श्री.धनराज वैजनाथ निला, उप मुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रा.पं.), जिल्हा परिषद, उस्मानाबाद. | अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड | रिक्त पदी |
| ७. | श्री.संजय साहेबराव मस्कर, उप प्रकल्प संचालक, राजीव गांधी पंचायत राज सशक्तीकरण अभियान, पुणे. | अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जळगांव. | रिक्त पदी |

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव व प्रवर्ग सध्याचे पदनाम व ठिकाण | तदर्थ पदोन्नतीनंतरच्या पदस्थापनेचे पदनाम व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| ८. | श्री.संजीव रणजितराव जाधव, सह संचालक, राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान, मुंबई. | प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जि.पालघर. | रिक्त पदी |
| ९. | श्री.संतोष वसंत धोत्रे, उप मुख्य कार्यकारी अधिकारी (सा.प्र.), जिल्हा परिषद, रत्नागिरी. | अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जालना. | श्री.ए.डी.कोल्हे यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदी |
| १०. | श्री.शिवाजी दत्तात्रय कपाळे, उप मुख्य कार्यकारी अधिकारी (सा.प्र.), जिल्हा परिषद, हिंगोली. | अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, परभणी. | रिक्त पदी |

२. वरील अधिकाऱ्यांना देण्यात आलेली तात्पुरती पदोन्नती ही खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे,-

अ) सदर तात्पुरती पदोन्नती ही आरक्षणासंदर्भात मा.उच्च न्यायालयात प्रलंबित असणाऱ्या याचिका क्र.८४५२/२००४ मधील T.A. १/२०१४ आणि T.A. २/२०१४ च्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहील.

ब) सदर तात्पुरती पदोन्नती ही जे अधिकारी ज्येष्ठ आहेत, परंतु ज्यांची प्रकरणे विचारार्थ खुली ठेवण्यात आलेली आहेत, अशा अधिकाऱ्यांच्या ज्येष्ठतेस बाधा न आणता देण्यात येत आहे.

क) वरील अधिकाऱ्यांना तात्पुरती पदोन्नती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

ड) सदर तात्पुरती पदोन्नती ही त्यांच्या वयाच्या ५०/५५ व्या वर्षानंतर पुनर्विलोकन करावयाच्या शासन निर्णयाच्या अधीन राहील.

संबंधित विभागीय आयुक्त /मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांनी तात्पुरत्या पदोन्नतीने नियुक्ती देण्यात आलेल्या वरील अधिकाऱ्यांना स्थानिक पर्यायी व्यवस्था करुन, तात्काळ कार्यमुक्त करावे आणि नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ हजर होण्याबाबत संबंधितांना सूचना दयाव्यात. तसेच संबंधित अधिका-यांनी पदभार स्वीकारल्यानंतर त्याचा अहवाल शासनास सादर करावा. तसेच, श्री.एस.ए. कौसाडीकर यांना प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जि.जालना या पदावर दिनांक १.९.२०१५ रोजी किंवा तद्नंतर पदस्थापना देण्यात यावी.

४. तात्पुरत्या पदोन्नतीने नियुक्ती दिलेल्या अधिकाऱ्यांनी त्यांच्या नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे त्यांनी अनधिकृतरित्या रजेवर जाऊ नये. यासंदर्भात त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभाग परिपत्रक क्रमांक सीडीआर १०८२/२५६७/२८ /११, दिनांक ३०.८.१९८२ अन्वये दिलेल्या सूचनांकडे वेधण्यात येत आहे. तसेच तदर्थ पदोन्नतीने दिलेली नियुक्ती रद्द करणेसाठी कुठल्याही स्वरुपाचे आवेदन करु नये. तसे केल्यास सदर अधिकारी शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८२७१६०४००७४२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHINDE VIJAY DATTATRAYA

Digitally signed by SHINDE VIJAY DATTATRAYA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GAD,CID - 917064, postalCode=400032, st=Maharashtra, cn=SHINDE VIJAY DATTATRAYA
Date: 2015.08.28 12:03:22 +05'30'

( वि.द. शिंदे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा. मंत्री (ग्राम विकास ) यांचे खाजगी सचिव
३. मा. राज्यमंत्री ( ग्राम विकास ) यांचे खाजगी सचिव
४. मा.प्रधान सचिव (ग्राम विकास व पंचायत राज ) यांचे स्वीय सहायक
५. सर्व विभागीय आयुक्त.
६. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
७. सर्व मुख्य लेखा व वित्त अधिकारी जिल्हा परिषद.
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ / २, मुंबई / नागपूर.
९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१०.संबंधित अधिकारी (संबधित विभागीय आयुक्त/मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्यामार्फत)
११. सामान्य प्रशासन विभाग, (कार्य-१२/कार्यासन-१३/कार्यासन-१६ब), मंत्रालय, मुंबई.
१२.कार्यासन क्रमांक आस्था-२, ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१३.निवड नस्ती, का.क्र. आस्था-३, ग्राम विकास व जलसंधारण विभाग